लघुलेखक गट-ब (उच्च श्रेणी) संवर्गातून
स्वीय सहायक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी)
या संवर्गात पदोन्नती....

**महाराष्ट्र शासन.**

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०१८/प्र.क्र.६१/फ-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १९ सप्टेंबर, २०१८.

**संदर्भ :-** अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-७(१)/प्र.क्र.६१/१६५ /१७-१८, दि.२३/०३/२०१८ , दि.०१/०८/२०१८, दि.२१/०८/२०१८ व दि.३१/०८/२०१८.

**शासन आदेश :-**

लघु लेखक उच्च श्रेणी गट-ब अराजपत्रित वेतनश्रेणी रु.९३००-३४८००+ग्रेड पे रु. ४४०० या संवर्गातुन स्वीय सहायक गट-अ राजपत्रित वेतनश्रेणी रु.९३००-३४८००+ग्रेड पे रु. ४६०० या संवर्गात पदोन्नती देण्यासाठी दिनांक २०/०३/२०१८ रोजी पदोन्नती समितीची बैठक आयोजित करण्यात आली होती. पदोन्नती समितीने विचारात केलेल्या शिफारशी विचारात घेऊन अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी उपरोक्त संदर्भात नमूद दि.२३/०३/२०१८ रोजीच्या पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने, सामान्य प्रशासन विभागाने लघु लेखक उच्च श्रेणी गट-ब अराजपत्रित वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० + ग्रेड पे रु. ४४०० या संवर्गातुन स्वीय सहायक गट-अ राजपत्रित वेतनश्रेणी रु.९३००-३४८००+ग्रेड पे रु. ४६०० या संवर्गात तात्पुरत्या पदोन्नतीच्या निवडसुचीस मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने सन २०१७-१८ च्या निवडसूचीतील खालील अधिकाऱ्यांना स्वीय सहायक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) संवर्गात पदोन्नती व पदस्थापना देण्याबाबत शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र | अधिकाऱ्यांचे नाव | पदोन्नतीचा प्रवर्ग | महसुली विभाग | पदोन्नतीनंतर प्रस्तावित पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. व्ही. जी. बेंडे | अ.जा. तथा खुला | नागपूर | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती तंत्रज्ञान व धोरण) म.रा. नागपूर याचे स्विय सहायक (रिक्त पदावर) |
| २ | सौ. एम. आर. हिरे | खुला | पुणे | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मुख्यालय) सामाजिक वनीकरण, म.रा. पुणे याचे स्विय सहायक (रिक्त पदावर) |
| ३ | श्री. पी. जी. देशमुख | खुला | नागपूर | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) म.रा. नागपूर याचे स्विय सहायक (रिक्त पदावर) |

३. वद नमूद अधिकाऱ्यांना खालील अटीच्या अधिन राहून तदर्थ/तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नती देण्यात येत आहे :-

३.१ पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवा जेष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग/१६-ब यांनी दि.२९/१२/२०१७ च्या पत्रान्वये दिलेल्या सुचनांनुसार मान्यता देण्यात येत आहे.

३.२ सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा व सेवाजेष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

३.४ सदरहू पदाच्या तात्पुरत्या पदोन्नत्या नियमित करताना या निवडसूची पूर्वी तदर्थ पदोन्नतीने कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांना ज्येष्ठतेनुसार नियमित करण्याबाबतची कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

३.५ सदर अधिकाऱ्यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती कोणतीही पुर्व सूचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

३.६ सदर अधिकाऱ्यांची पदोन्नती ५०/५५ च्या वर्षाच्या पुर्नविलोकनाच्या निर्णयाच्या अधीन राहील.

४. सदर पदोन्नत अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे / नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे कार्यमुक्त केल्यानंतर विहित मुदतीत ते नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहीत धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.३०/४/१९९१ व दि.१२/९/२०१६ मधील तरतुदीनुसार शासनस्तवरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच पदोन्नती नाकारणाऱ्या अधिकाऱ्यांना आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत स्वीय सहायक (गट-अ) पदाचा १२/२४ वर्षाचा लाभ दिला असल्यास तो तात्काळ थांबविण्यात यावा व त्यांना स्वीय सहायक (गट-अ) या संवर्गात प्रत्यक्ष पदोन्नतीनंतर सदरचा लाभ देण्यात येईल याची कृपया नोंद घ्यावी.

५. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याने स्वीय सहायक या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यानंतर वेतन निश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प दिल्यास, त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्र. ११(१) (ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

६. हे आदेश तात्काळ अमलात येतील, सदर नियुक्ती/पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास anil.dhas@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत कळवावे.

**७.** सदर पदोन्नत्या महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई / नागपूर / औरंगाबाद तसेच मा.उच्च न्यायालय / मा.सर्वोच्च न्यायालय इत्यादी ठिकाणी स्वीय सहायक या संवर्गातील ज्येष्ठतेबाबत काही दावे / याचिका दाखल केलेल्या असल्यास, सदर प्रलंबित याचिकांच्या अंतिम निकालाच्या अधीन असतील.

सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८०९१९१६०५३८८४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anil N. Dhas

Digitally signed by Anil N. Dhas
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, cn=Anil N. Dhas
Date: 2018.09.19 16:11:09 +05'30'

**(अनिल धस)**
कक्ष अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य,नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, म.रा., पुणे.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), म.रा.नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), म.रा., नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती तंत्रज्ञान व धोरण) म.रा., नागपूर.
६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संरक्षण) म.रा., नागपूर .
७. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मुख्यालय) सामाजिक वनीकरण, म.रा., पुणे.
८. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक) अमरावती/ पुणे/नाशिक.
९. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
१०.उप सचिव (कार्यासन-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई .
११.जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती /नागपूर/ पुणे.
१२.मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१३.संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक, म.रा.नागपूर यांचे मार्फत
१४.निवड नस्ती (फ-८ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.